**महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम,१९७७**
**(सुधारणा २००६)**
**महाराष्ट्र राज्य रोजगार हमी परिषदेची पुर्नरचना**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक मग्रारोहयो २०११/प्र.क्र.८६/ रोहयो-१०**
**मंत्रालय मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: १३ ऑक्टोबर,२०११**

**वाचा - शासन निर्णय क्रमांक रोहप २००५/प्र.क्र.१७९/ रोहयो-८, दि. ४ जानेवारी,२००६**

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियम,२००५ मधील कलम १२(१) अन्वये राज्य रोजगार हमी परिषद स्थापन करण्याबाबत तरतूद नमूद आहे. केंद्रीय कायदयाच्या कलम १२ अन्वये दि. ४ जानेवारी २००६ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनास सल्ला देण्यासाठी महाराष्ट्र राज्य रोजगार हमी परिषदेची स्थापना करण्यात आली आहे. तसेच महाराष्ट्र राज्य रोजगार हमी परिषदेची स्थापना करण्याबाबत महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम १९७७ (सुधारणा २००६) कलम ४(१) अन्वये सदर तरतूद नमूद आहे. तथापि, केंद्रीय कायदयाशी सुसंगत सुधारणा करण्याच्या दृष्टीने ऑगस्ट,२००६ मध्ये महाराष्ट्र राज्य रोजगार हमी कायदा,१९७७ मध्ये सुधारणा करण्यात आल्या. त्याअनुषंगाने राज्य कायदयातील कलम ४(१) अन्व्यये राज्य रोजगार हमी परिषद गठीत करण्याबाबतची तरतूद असून याबाबत फेरविचार करणे शासनाच्या विचाराधीन होते. त्यावर शासनाने विचार केला असून आता शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय-**

शासन निर्णय क्रमांक, रोहप २००५/प्र.१७९/रोहयो-८, ४ जानेवारी,२००६ अधिक्रमित करण्यात येत असून महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम,१९७७ (सुधारणा,२००६) कलम ४ (१) अन्वये महाराष्ट्र राज्य रोजगार हमी परिषद गठीत करण्यात येत असून परिषदेवर अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्यकारी अध्यक्ष व सदस्यांची नियुक्ती खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

महाराष्ट्र रोजगार हमी परिषदेचे सदस्य पुढील प्रमाणे असतील-

| | | |
|---|---|---|
| १) मा.मुख्यमंत्री | - | अध्यक्ष |
| २) मा.उप मुख्यमंत्री | - | उपाध्यक्ष |
| ३) मा. मंत्री (रोहयो) | - | कार्यकारी अध्यक्ष |
| ४) मा.मंत्री (ग्रामविकास) | - | सदस्य |
| ५) मा.मंत्री (जलसंधारण) | - | सदस्य |
| ६) मा.मंत्री ( कृषि) | - | सदस्य |
| ७) मा. राज्यमंत्री (रोहयो) | - | सदस्य |
| ८) प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण) | - | सदस्य सचिव |
| ९) प्रधान सचिव (ग्रामविकास) | - | सदस्य |
| १०) प्रधान सचिव (नियोजन) | - | सदस्य |
| ११) प्रधान सचिव (कृषि) | - | सदस्य |
| १२)आयुक्त (MGNREGS) | - | सदस्य |

२. तसेच महाराष्ट्र राज्य रोजगार हमी परिषदेवर महाराष्ट्र राज्य रोजगार हमी अधिनियम,१९७७ (सुधारणा २००६) कलम ४(१) नुसार जास्तीत जास्त १५ अशासकीय सदस्य राज्य शासन नामनिर्देशित करेल.

- ते पंचायत राज संस्था कामगार संघटना, लाभवंचित गटामधील (disadvantaged groups)असावेत.
- त्यापैकी किमान १/३ महिला सदस्य असतील
- तसेच किमान १/३ सदस्य अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग आणि अल्पसंख्यांकमधील असतील.

३. जास्तीत जास्त १५ अशासकिय सदस्यांच्या नियुक्तीबाबत स्वंतत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील. तसेच महाराष्ट्र रोजगार हमी परिषदेवर सदस्यांची नियुक्ती व इतर अनुषंगीक बाबींबाबत नियम (Rules) महाराष्ट्र राज्य रोजगार हमी

अधिनियम,१९७७ (सुधारणा २००६) कलम १७(१) नुसार निर्गमित करण्यात येतील. {वाचा- महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियम २००५ मधील कलम ३२(२) (सी)}

सदर परिषदेची बैठक वर्षातून किमान दोनदा होईल. बैठकीची वेळ व जागा अध्यक्ष तथा कार्यकारी अध्यक्ष ठरवतील त्याप्रमाणे असेल.

४. महाराष्ट्र राज्य रोजगार हमी परिषदेची कार्यकक्षा महाराष्ट्र राज्य रोजगार हमी अधिनियम,१९७७ (सुधारणा २००६) कलम ४(३) नुसार राहील. राज्य रोजगार हमी परिषदेची कर्तव्ये व कामे पुढीलप्रमाणे असतील.

१) राज्य शासनास योजनेच्या अंमलबजावणी व इतर बाबींबाबत सल्ला देणे. अग्रकमाने हाती घ्यावयाची कामे निश्चित करुन त्याची यादी तयार करणे.

२) या अधिनियमातील व त्याखाली आखण्यात आलेल्या योजना यांचे संनियंत्रण व गा-हाणी दुर करणारी यंत्रणा यांचा वेळोवेळी आढावा घेणे व त्यात सुधारणा सुचविणे. तसेच योजनेविषयी व्यापक प्रसार करणे.

३) अधिनियम व योजना अंमलबजावणीचे संनियंत्रण करणे.

४) विधीमंडळापुढे सादर करणेसाठी वार्षिक अहवाल तयार करणे.

५) राज्य शासनाकडून नेमून देण्यात आलेली कर्तव्ये व कार्य पार पाडणे.

५. राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनांचे मुल्यनिर्धारण करण्याचा आणि त्याअनुषंगाने ग्रामीण अर्थव्यवस्थेच्या संदर्भातील सांख्यिकी माहिती गोळा करण्याचा तसेच योजना व कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याचा अधिकार महाराष्ट्र राज्य रोजगार हमी परिषदेला असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०११२०१३१४५५१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

13/10/2011

(आर.विमला)
उपसचिव, नियोजन विभाग

प्रति,
१. मा. राज्यपालांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव
५. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मुख्य सचिव
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
८. सर्व विभागीय आयुक्त
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय
१२. महासंचालक, यशदा, पुणे
१३. उप सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ (रोजगार हमी योजना समिती), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१४. सर्व उप सचिव/अवर सचिव /कक्ष अधिकारी (रोहयो प्रभाग)
१५. कक्ष अधिकारी, रोहयो-१ (सारग्रंथाकरिता)
१६. निवड नस्ती, रोहयो-१०.

---------------